दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागात शालेय पोषण
आहार योजनेंतर्गत पुरक आहार देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः शापोआ- २०१६/प्र.क्र.२६२/एस.डी.३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २९ मे, २०१७

**प्रस्तावना:-**

प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण करण्याच्या दृष्टीने तसेच, प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या पट नोंदणी व उपस्थितीचे प्रमाण वाढविण्यासाठी आणि शाळेतील विद्यार्थ्यांची गळती थांबविण्याकरिता केंद्र पुरस्कृत शालेय पोषण आहार योजना दि. २२/११/१९९५ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. शालेय पोषण आहार योजनेतंर्गत सन १९९५ ते २००२ पर्यंत फक्त तांदुळ देण्यात येत होता. रिट याचिका क्रमांक १९६/२००१ (Peoples Union for Civil Liberties (PUCL) विरुध्द भारत सरकार) मध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २८ नोव्हेंबर २००१ रोजी दिलेल्या आदेशानुसार सदर योजनेअंतर्गत सन २००२ पासून शिजविलेले अन्न देण्यास सुरुवात झाली.

२. शासकीय शाळा, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळा, खाजगी अनुदानित व अंशत: अनुदानित शाळा या ठिकाणी शिकणारे इयत्ता १ ली ते इयत्ता ८ वी पर्यंतचे विद्यार्थी शालेय पोषण आहार योजनेचे लाभार्थी आहेत. सन २००८ पर्यंत सदर योजना इयत्ता ५ वी पर्यंत होती. सन २००८ पासून प्रस्तुत योजना इयत्ता ८ वी पर्यंत वाढविण्यात आली आहे.

३. दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागामध्ये करावयाच्या विविध उपाययोजना याबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात रिट याचिका क्र. ८५७/२०१५ दाखल झालेली आहे. सदर याचिकेमध्ये दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागातील उन्हाळी सुटीमध्ये शालेय पोषण आहार या विषयाचा ही समावेश आहे. सदर याचिकेवर दि.१३/०५/२०१६ रोजी सुनावणी झाली असून मा. सर्वोच्च न्यायालयाने शालेय पोषण आहार योजनेंतर्गत आठवडयातून किमान ३ दिवस विद्यार्थ्यांना अंडी/दूध/पौष्टिक आहार देण्याचे निर्देश दिलेले आहेत.

४. मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या वरील आदेशाच्या अनुषंगाने दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागात शालेय पोषण आहार योजनेसाठी पात्र विद्यार्थ्यांना आठवडयातून ३ दिवस अंडी / दूध / फळे / पौष्टीक आहार पुरविण्याची योजना सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

१. दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागात शालेय पोषण आहार योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना आठवडयातून ३ दिवस दूध / अंडी / फळे / पौष्टीक आहार देण्यासाठी प्रति विदयार्थी प्रतिदिन रु. ५/- याप्रमाणे प्रति विद्यार्थी प्रति आठवडा रु. १५/- इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेची अंमलबजावणी खालीलप्रमाणे करण्यात यावी.

२.१) महसूल व वन विभागामार्फत दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश गावांची यादी जाहीर झाल्यानंतर तात्काळ या गावांतील शालेय पोषण आहार योजनेसाठी पात्र विद्यार्थ्यांना प्रति विद्यार्थी प्रति आठवडा रु. १५/- इतका निधी शालेय पोषण आहार योजनेच्या राज्य हिस्स्यासाठीच्या निधीतून जिल्ह्यांना वितरीत करण्यात यावा.

२.२) जिल्हास्तरावरुन सदर निधी शाळास्तरावर शाळा व्यवस्थापन समितीच्या खात्यावर वर्ग करण्यात येवून शाळा व्यवस्थापन समितीमार्फत अन्न शिजविण्याच्या यंत्रणांच्या मदतीने विद्यार्थ्यांना आठवडयातून ३ दिवस अंडी / दूध / फळे / पौष्टीक आहार पुरविण्यात यावा.

२.३) अशा प्रकारे लाभ देण्यात येणाऱ्या दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश गांवातील शाळांमध्ये लोकसहभाग / ग्रामनिधी / जिल्हानिधीतून बायोमेट्रिक मशिन बसविणे आवश्यक राहील.

२.४) बायोमॅट्रिक मशिनवर हजेरी घेतलेल्या विद्यार्थ्यांनाच हा पोष्टीक आहार देय होईल.

२.५) स्थानिक पातळीवर उपलब्ध होणारे पदार्थ देण्यावर भर देण्यात यावा. आठवडयातील तीनही दिवस एकच प्रकारचा पौष्टीक आहार न देता आहारामध्ये वैविध्य ठेवावे.

२.६) सदर योजना सुरु झाल्यानंतर पुढील वर्षासाठीची दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागाची यादी जाहीर होईपर्यंत अथवा १ वर्ष यापूर्वी जे लवकर होईल तोपर्यंत लागू राहील. पुढील वर्षासाठीची दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश गावांची यादी जाहीर झाल्यानंतर नवीन यादीतील गावांसाठी योजना सुरु होईल.

३. यासाठी येणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्र. ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, (०१) (१६) मुंबई महानगरपालिका क्षेत्राव्यतिरिक्त इतर क्षेत्रात शालेय पोषण आहार कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा) (२२०२ ३८१५), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)"

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५८२/२०१६/व्यय-५, दिनांक २८/१०/२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५२९१७३८४२७०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.05.29 17:44:14 +05'30'

**( डॉ. सुवर्णा खरात )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१२. शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१३. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती - एस.डी.३.